कृषि उत्पन्न बाजार समिती, वडगाव, जि.कोल्हापूर येथे नवीन शेतकरी भवन बांधण्याच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: कृबास-०१२४/प्र.क्र.२१६/२१-स,**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२,**
**दिनांक:- ०९ एप्रिल, २०२५.**

**संदर्भ:-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०/०९/२०१९.
२) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५/०९/२०१९.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थस-२०२३/प्र.क.४३/अर्थ-३, दि.१२/०४/२०२३.
४) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.कृबास-०३२३/प्र.क्र.११९/२१-स, दि.१९/१२/२०२३.
५) पणन संचालक, पुणे यांचे पत्र क्र.पणन-५/कृउबास/तुकडोजी महाराज/शेतकरी भवन/२७६०/२०२४, दि.२६/०७/२०२४.

**प्रस्तावना:-**

"राष्ट्रसंत तुकडोजी महाराज शेतकरी भवन" या योजनेंतर्गत राज्यातील कृषी उत्पन्न बाजार समिती असलेल्या ठिकाणी शेतकरी बांधवांना मुक्कामाची सोय व्हावी तसेच शेतकऱ्यांच्या मूलभूत सुविधा देखील त्याच ठिकाणी उपलब्ध व्हाव्यात या दृष्टीने ज्या कृषी उत्पन्न बाजार समितीमध्ये शेतकरी भवन उपलब्ध नाही तेथे नवीन शेतकरी भवन बांधणे तसेच, ज्या बाजार समितीच्या परिसरात शेतकरी भवन अस्तित्वात आहे तथापि, सुस्थितीत नाही अशा शेतकरी भवनाची दुरुस्ती करणे यासाठी शासन अनुदान उपलब्ध करुन देण्यास संदर्भ क्र.४ येथील दि.१९.१२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

सदर योजनेंतर्गत पणन संचालक, पुणे यांनी संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये सादर केलेल्या कृषि उत्पन्न बाजार समिती, वडगाव, जि.कोल्हापूर येथे नवीन शेतकरी भवन बांधण्याच्या एकूण रु.१५०.२३ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

कृषि उत्पन्न बाजार समिती, वडगाव, जि.कोल्हापूर येथे नवीन शेतकरी भवन बांधण्यासाठी बाजार समितीने तयार केलेल्या रु.१,५०,२२,९५१/- (अक्षरी रुपये एक कोटी पन्नास लक्ष बावीस हजार नऊशे एकावन्न फक्त) एवढ्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२.	कृषि उत्पन्न बाजार समिती, वडगाव जि.कोल्हापूर येथे नवीन शेतकरी भवन बांधण्यासाठी बाजार समितीच्या सल्लागार अभियंता यांनी सन २०२२-२३ च्या दरसूचीवर आधारीत तयार केलेल्या अंदाजपत्रकाचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

(Rs in Lakhs)

| Sr.No. | Details | Amount |
|---|---|---|
| 1 | Civil Work | 1,17,95,791/- |
| 2 | Royalty Charges | 33,344/- |
| 3 | Quality Control Testing Charges | 1,26,910/- |
| 4 | GST 18% | 21,23,242/- |
| 5 | Labour Insurance Charges 1% | 1,17,958/- |
| 6 | Contingencies 5% | 4,71,832/- |
| 7 | Electrification Charges 5% | 3,53,874/- |
| | **Total** | **1,50,22,951/-** |

३.	सदर अंदाजपत्रकास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) राष्ट्रसंत तुकडोजी महाराज शेतकरी भवन योजनेबाबतच्या संदर्भाधीन दि.१९.१२.२०२३ च्या मूळ शासन निर्णयातील अटी व शर्ती लागू राहतील.

२) बाजार समितीने प्रस्तावासोबत ७/१२ उतारा, पणन मंडळाचे कर्ज अंशदान/याबाबतचे प्रमाणपत्र, वैधानिक लेखापरीक्षण अहवाल प्रमाणपत्र इ.कागदपत्रे जोडलेली नसल्याने सदर कागदपत्रांची पूर्तता करुन घेण्यात यावी.

३) सदर शेतकरी भवन बांधकामाच्या अंदाजपत्रकास पणन संचालनालयात कार्यरत असलेल्या उप अभियंता (स्थापत्य), सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी तांत्रिक मान्यता (Technical Sanction) प्रदान करावी. त्यानंतरच विहित कार्यपध्दतीनुसार निविदा प्रक्रिया राबवून कार्यारंभ आदेश देण्यात यावेत.

४) संबंधित बाजार समितीचे सचिव यांनी सदर बांधकामाचा प्रगती अहवाल वेळोवेळी जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, जि.कोल्हापूर यांना सादर करावा.

५) शेतकरी भवनाचे बांधकाम प्रशासकीय मान्यतेच्या दिनांकापासून एक वर्षाच्या आत पूर्ण करण्यात यावे.

६) कृषि उत्पन्न बाजार समिती, वडगाव, जि.कोल्हापूर या “अ” वर्गातील बाजार समितीस योजनेच्या दि.१९.१२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयानुसार रु.१५०.२३ लक्ष रकमेच्या अंदाजपत्रकाच्या ५०% टक्केप्रमाणे रु.७५.११ लक्ष इतके शासन अनुदान अनुज्ञेय राहील. सदर अनुदान ५०% : ५०% याप्रमाणे २ टप्प्यात वितरीत करण्यात येईल. बाजार समितीने सादर केलेल्या अंदाजपत्रकातील उर्वरित निधी बाजार समितीने स्वनिधी/ कर्ज या माध्यमातून उपलब्ध करुन बांधकाम करणे बंधनकारक राहील.

७) सदर शेतकरी भवनाचा दैनंदिन खर्च, देखभाल दुरुस्ती, मनुष्यबळावरील खर्च, वीज व पाणी देयके इ.वरील खर्च हा संबंधित बाजार समितीने करणे बंधनकारक आहे. त्यासाठी शासनाकडून कोणत्याही प्रकारे निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही.

४. सदरहू खर्च "मागणी क्र.व्ही-३, मुख्य लेखाशिर्ष- ४४३५-इतर कृषि विषयक कार्यक्रम यावरील भांडवली खर्च, ०१, पणन व गुणवत्ता नियंत्रण, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००)(०३) राष्ट्रसंत तुकडोजी महाराज शेतकरी भवन बांधणे (कार्यक्रम) (४४३५ ००९३) ५४, गुंतवणूका" या लेखाशिर्षाखाली खर्ची दर्शविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२०.०९.२०१९ च्या शासन निर्णयान्वये व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि.२५.०९.२०१९ च्या शासन परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४०९१०५८०८९३०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MADHAVI SANDEEP SHINDE

Digitally signed by MADHAVI SANDEEP SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=020531e249e88fe74bf6db805f42944e7f29bc0ba6134c83c1f183b8cc27f2ff, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4CB1CBBD6A4EE442FDAA6C1B358BF61FEAF9AEFC16E8F39E9EE1D06B9E8A7A59, cn=MADHAVI SANDEEP SHINDE
Date: 2025.04.09 10:59:00 +05'30'

**(माधवी सं. शिंदे)**

**अवर सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. पणन संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे.
३. मुख्य अभियंता (स्थापत्य), सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर.
४. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, जि.कोल्हापूर.
५. सचिव, कृषि उत्पन्न बाजार समिती, वडगाव, जि.कोल्हापूर.
६. निवड नस्ती/२१-स.